**कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभागाच्या अधिपत्याखालील आयुक्तालय तसेच, संचालनालयांतर्गत राज्यस्तरीय/ स्थानिक खरेदी समिती स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास,रोजगार व उद्योजकता विभाग**
**शासन निर्णय क्र. कौविउ-२०२२/प्र.क्र.१२/प्रशा-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ११ फेब्रुवारी, २०२२

**वाचा:-** १. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१ डिसेंबर, २०१६

२. कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्र. आयटीआय २०१४/ प्र.क्र.१३१/व्यशि-३, दिनांक १८ मे, २०१७

३. कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्र.कौविउ-२०१९/ प्र.क्र.२४३/प्रशा-१, दिनांक १९ नोव्हेंबर, २०१९

४. कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्र.कौविउ-२०२०/ प्र.क्र.७२/व्यशि-५, दिनांक २२ जून, २०२०

५. संचालक व्यवसाय शिक्षण प प्रशिक्षण संचालनालय, मुबई ५१ यांचे पत्र क.१३/व्यशिप्रशि/ खरेदी/२०२१-२२/रा.ख.स/ ०७ दि.२४ जानेवारी, २०२२

**प्रस्तावना:-**

उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने दिनांक ०१ डिसेंबर, २०१६ च्या शासन निर्णयान्वये शासकीय विभागाने करावयाच्या खरेदीसाठीच्या कार्यपद्धतीची नियमपुस्तिका निर्गमित केली आहे. सदर नियम पुस्तिकेतील प्रकरण क्र.२ मधील मुद्दा क्र. २.९ मध्ये विविध समित्यांची रचना व अधिकार नमूद करण्यात आले आहे.

२. सदर नियमपुस्तिकेत घालून देण्यात आलेल्या कार्यपद्धतीतील तरतुदीप्रमाणे कौशल्य विकास व उद्योजकता विभाग (खुद्द) व त्यांच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालयाची खरेदी समित्याची एकसूत्रीपणा असावा, याकरीता खरेदी समिती (डीपीसी/पीसी) संदर्भ क्र. ३ अन्वये गठीत करण्यात आली होती. तसेच, संदर्भ क्र. ४ अन्वये कौशल्य विकास व उद्योजकता विभाग (खुद्द) व त्यांच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालये यांची खरेदी प्रक्रिया राबविणेकरीता रुपये पाच कोटींवरील खरेदी संदर्भातील सर्व प्रकरणे उच्चस्तरीय समितीपुढे सादर करणेकरीता उच्चस्तरीय समिती स्थापन करण्यात आली होती.

३. तथापि, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयांतर्गत विविध योजनांतर्गत साहित्याची खरेदी करताना साहित्याच्या विविधतेमुळे खरेदी प्रक्रिया राबविताना साहित्याची आवश्यकता निश्चित करणे,तांत्रिक विनिर्देश निश्चित करणे,तांत्रिक मान्यता,प्रशासकीय मान्यता,निधी वितरण व प्रत्यक्ष निविदा प्रसिध्द करणे,निविदांची छाननी इ.तांत्रिक बाबींकरीता लागणारा कालावधी तसेच विविध केंद्रशासन पुरस्कृत प्रकल्प राबविण्याकरीता विचारात घेता अंतिम प्रक्रियेकरीता अत्यंत कमी कालावधी उपलब्ध होत असतो. याकरिता संदर्भ क्र. २ ते ४ अन्वये गठीत राज्यस्तरीय खरेदी समिती

बाबतचा शासन निर्णय अधिक्रमित करुन नव्याने राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग व स्थानिक खरेदी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

या शासन निर्णयान्वये संदर्भ क्र. २ ते ४ येथील शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहे. तसेच, कौशल्य विकास,रोजगार व उद्योजकता विभागाच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालये यांचेकरीता खरेदी प्रक्रिया राबविण्यासाठी खालीलप्रमाणे समित्या गठीत करण्यात येत आहेत-

अ) कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालये यांचेमार्फत राबविण्यात येणाऱ्या सर्व योजना/प्रकल्पांतर्गत रुपये ५ कोटी किंवा त्यापेक्षा अधिक खरेदी संदर्भातील सर्व प्रकरणांना मान्यता देण्यासाठी खालीलप्रमाणे समितीचे (डीपीसी/पीसी) गठन करण्यात येत आहे:-

**<u>राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समिती</u>**

| | | |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुबई | अध्यक्ष |
| २ | संबधीत सह सचिव/उप सचिव कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुबई | सदस्य |
| ३ | आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय | सदस्य |
| ४ | संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय | सदस्य |
| ४ | खरेदी प्रक्रियेशी संबधीत कामकाज हाताळणारे संबधित कार्यासनाचे अवर सचिव/कक्ष अधिकारी, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुबई विभागाचा प्रतिनिधी | सदस्य सचिव |
| ५ | लेखा व कोषागारे संचालनालयातील गट-अ किंवा गट-ब दर्जाचा लेखाधिकारी | निमंत्रित |
| ६ | उद्योग सहसंचालक (भांडार खरेदी)/ उद्योग संचालनालय किंवा त्यांचे प्रतिनिधी | निमंत्रित |
| ७ | अन्य विभागांकडून कोणताही निमंत्रित आवश्यकता असल्यास | निमंत्रित |
| ८ | तांत्रिक तज्ञ, आवश्यकता असल्यास | निमंत्रित |

उक्त मर्यादेतील सर्व खरेदी प्रकरणे वरील राज्यस्तरीय खरेदी समितीसमोर आणणे बंधनकारक राहील. तसेच, अन्य तज्ञ व्यक्तींना निमंत्रित करण्याचे अधिकार समिती अध्यक्षांना राहतील.

ब) कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभागाच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालये यांचेमार्फत राबविण्यात येणाऱ्या सर्व योजना/प्रकल्पांतर्गत रुपये पाच कोटींपर्यंत किंमतीच्या मर्यादेतील खरेदी प्रक्रीया राबविण्यासाठी आयुक्तालय/संचालनालयासाठी पुढीलप्रमाणे स्थानिक खरेदी समितीचे गठन करण्यात येत आहे-

| | | |
|---|---|---|
| १ | विभागप्रमुख (आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता/ संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय) | अध्यक्ष |
| २ | संबधित खरेदीदार कार्यालयाचा खरेदी प्रक्रिया हाताळणारा गट "अ" दर्जापेक्षा कमी नसलेला ज्येष्ठ अधिकारी | सदस्य सचिव |
| ३ | लेखा व कोषागारे संचालनालयातील गट-अ किंवा गट-ब दर्जाचा लेखाधिकारी | निमंत्रित |
| ४ | उद्योग सहसंचालक (भांडार खरेदी)/ उद्योग संचालनालय किंवा त्यांचे प्रतिनिधी | निमंत्रित |
| ५ | अन्य विभागांकडून कोणताही निमंत्रित आवश्यकता असल्यास | निमंत्रित |
| ६ | तांत्रिक तज्ञ, आवश्यकता असल्यास | निमंत्रित |

३. याअनुषंगाने स्पष्ट करण्यात येते की, स्थानिक खरेदी समितीस रुपये ५ कोटीपर्यंतची खरेदी प्रक्रिया राबविण्याचे अधिकार देण्यात येत आहेत. तसेच, अन्य तज्ञ व्यक्तींना निमंत्रित करण्याचे अधिकार समिती अध्यक्षांना राहतील.

४. विभागप्रमुखांना रुपये १० लाखांवरील पुढील सर्व खरेदी प्रकरणांना प्रशासकीय मान्यता घेणे बंधनकारक राहील.

५. विभागप्रमुखांना रुपये दहा लाखापर्यंतच्या सर्व खरेदी प्रकरणांना वरील नमूद खरेदी समितीची बैठक न बोलविता निर्णय घेण्याचा अधिकार असेल.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आलेला आला असून संगणक सांकेतांक २०२२०२१११७१२५२८५०३ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात आलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DR. NAMDEO
KONDIBA BHOSALE

Digitally signed by DR. NAMDEO KONDIBA BHOSALE
DN: CN = DR. NAMDEO KONDIBA BHOSALE, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra
Date: 2022.02.11 17:54:05 +05'30'

**( ना.को.भोसले )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र१/२, मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र१/२, मुंबई/नागपूर
३. विकास आयुक्त(उद्योग) उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई-३२
४. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय
५. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय
६. प्रधान सचिव, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
७. सह सचिव/ उप सचिव, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग
८. सर्व कार्यासने
९. निवड नस्ती.(प्रशासन-१)